महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ अंतर्गत स्थापन झालेल्या लघु वितरिकास्तरीय पाणी वापर संस्थाशी करावयाचा करारनामा.

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग
शासन परिपत्रक क्र.सीडीए-१००९/(१४३/२००९)/लाक्षेवि(कामे)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०६ फेब्रुवारी, २०१०

# परिपत्रक

पाटबंधारे प्रकल्पावर पाणी वापर संस्था स्थापन करण्यासाठी महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ हा स्वतंत्र कायदा तयार करण्यात आला आहे. या कायद्याअंतर्गत लघु वितरिकास्तरीय पाणी वापर संस्था स्थापन झाल्या आहेत. सदर लघु वितरिकास्तरीय पाणी वापर संस्थांना वितरण प्रणाली सिंचन व्यवस्थापनासाठी हस्तांतर करण्यापुर्वी करावयाचा करारनाम्याचा मराठी व इंग्रजी मसूदा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट उपलब्ध करण्यात आला आहे व त्यानुसार पाणी वापर संस्थांशी करारनामा करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक व करारनाम्याचा मसूदा महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२०६१८०८५२००१ असा आहे.

(चं.रा.तेजाळे)
शासनाचे उप सचिव

प्रत,
सचिव (जसं) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ

महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग
सर्व कार्यकारी अभियंता व अवर सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ

# करारनामा

## १.० करारनाम्यातील पक्षकारः

१.१ मा. राज्यपाल, महाराष्ट्र शासन यांचे तर्फे कार्यकारी अभियंता, ------------------- विभाग------------------ (यापुढे जल संपदा विभाग-जसंवि-असे संबोधण्यात येईल) आणि अध्यक्ष ----------------, पाणी वापर संस्था------------------(म.सिं.प.शे.व्य. अधिनियम, २००५ व नियम २००६ अंतर्गत नोंदणी क्र.-------------------- अन्वये गठीत झालेली आणि महाराष्ट्र शासनाच्या दि.---------- रोजीच्या राजपत्रात अधिसूचना क्र.३ अन्वये अधिसूचित झालेली) या दोघांमध्ये महाराष्ट्र सिंचन पध्दतींचे शेतकऱ्यांकडून व्यवस्थापन अधिनियम, २००५ (यापुढे अधिनियम असे संबोधण्यात येईल) मधील कलम क्र.२१ व २९ अन्वये हा करारनामा करण्यात येत आहे.

१.२ या करारनाम्यात जल संपदा विभाग या संज्ञेत नदीखोरे अभिकरणाचा समावेश आहे. तसेच कालवा अधिकारी म्हणजे कार्यकारी अभियंता किंवा त्यांचा प्राधिकृत प्रतिनिधी.

## २.० करारनाम्याची उद्दीष्टे:

२.१ -------------जिल्ह्यातील -------------- तालुक्यातील ----------- नदीच्या उपखोऱ्यातील------- सिंचन प्रकल्पातील ----------- मुख्य कालव्यावरील वितरिका क्रमांक --------- वरील लघुवितरिका क्रमांक ---------- वरील पाणी वापर संस्थेस ------ हेक्टर लागवडीलायक क्षेत्र सिंचन व्यवस्थापनाकरता हस्तांतरित करणे.

२.२ व्यवस्थापनाच्या हेतूने पाणी वापर संस्थेस हस्तांतरित केलेल्या कालवा प्रणालीची मालकी अधिनियमाच्या कलक क्र.६९ अन्वये यापुढेही राज्य शासनाकडेच राहील.

२.३ उपरोक्त सिंचन प्रणाली पाणी वापर संस्थेकडे हस्तांतरित करतांना असे अपेक्षित आहे की, पाण्याचे केवळ समन्यायी वाटपच होणार नाही तर पाणी वापराच्या कार्यक्षमतेत व पिकांच्या उत्पादकतेतही सुधारणा होईल.

२.४ या करारनाम्यात खालील बाबींचा अंतर्भाव करण्यात आला आहे.

(१) देय पाणी वापर हक्कांनुसार घनमापन पध्दतीने पाणी वापर संस्थेला लघुवितरिकेच्या मुखाशी वेळेवर पाणी पुरवठा करण्या संदर्भात ज.सं.वि. ची कर्तव्ये व जबाबदाऱ्या

(२) पाणी वापर संस्थांना देखभाल व दुरुस्ती करता गरजेप्रमाणे निधी उपलब्ध करुन देणे

(३) पाणी वापर संस्थांना प्रशिक्षण व तांत्रिक सहाय्य देणे

(४) खालील बाबींसंदर्भात पाणी वापर संस्थांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या

१) संस्थेच्या सदस्यांना त्यांच्या हिश्शाप्रमाणे पाणी वाटप करणे

२) पाणी वापर संस्थेस हस्तांतरित केलेल्या कालवा प्रणालीच्या योग्य देखभाल-दुरुस्तीकरता निधीचा वापर करणे

३) संस्थेच्या सदस्यांकडून पाणीपट्टी वसूल करणे

४) जल-व्यवस्थापन व संस्थेचा लेखा या बद्दलचे अभिलेख अद्ययावत ठेवणे

## ३.० पाणी वापर हक्क :

३.१ ----------- हेक्टर निर्धारित लागवडीलायक क्षेत्राकरता (सी.सी.ए.) महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाने (म.ज.नि.प्रा.) निश्चित केल्याप्रमाणे सर्वसाधारण वर्षात संस्थेचा मंजुर पाणी वापर हक्क रब्बी हंगामात ------ सहस्त्र घनमीटर व उन्हाळी हंगामात -------- सहस्त्र घनमीटर असेल.

३.२ ज.सं.वि. दरवर्षी १५ ऑक्टोबर रोजी जलाशयातील पाणीसाठा लक्षात घेऊन रब्बी (१५ ऑक्टोबर ते २८ फेब्रुवारी) व उन्हाळी (१ मार्च ते ३० जून) हंगामांकरीता स्वतंत्ररित्या देय पाणी वापर हक्क व विहित पाणी वापर हक्क निश्चित करेल.

३.३ म.ज.नि.प्रा. अधिनियमाच्या कलम ११(त्र) अन्वये दर तीन वर्षांनी मंजूर पाणी वापर हक्काचे पुनर्विलोकन करता येईल.

३.४ खरीप हंगामात (१ जुलै ते १४ ऑक्टोबर) पाणी वापर हक्क विहित करण्यात येणार नाही. खरीपातील पाणी पुरवठा हा संरक्षणात्मक सिंचनाकरता १-२ पाणीपाळ्या एवढाच असेल. पाणीसाठ्याच्या अथवा प्रकल्पाच्या संकल्पनेतील नियोजित पाणी वापराच्या २०% एवढयापर्यन्त खरीपातील पाणी पुरवठा मर्यादित असेल.

३.५ रब्बी हंगामात न वापरलेला देय पाणी वापर हक्क पा.वा. संस्थेस उन्हाळी हंगामात वापरता येईल. बाष्पीभवन व वहनव्यय लक्षात घेऊन ज.सं.वि. उन्हाळयातील देय पाणी वापर हक्क नव्याने निश्चित करेल व तसे संस्थेस कळविल.

३.६ खाली नमूद केलेल्या बंधनांच्या अधिन राहून देय पाणी वापर हक्काच्या मर्यादेत पाणी वापर संस्थेस विविध पिके घेण्याचे स्वातंत्र्य असेल. (बंधने, असल्यास, खाली नमूद करावीत)



## ४.० <u>पाणीपट्टीचे दर</u> :

४.१ संस्थेच्या मुखाशी दर हंगामात घनमापन पध्दतीने करावयाच्या पाणी पुरवठ्याच्या पाणीपट्टीचे दर म.ज.नि.प्रा ने निश्चित केल्याप्रमाणे असतील. करारनामा ज्या दिवशी होईल त्या दिवशी म.ज.नि.प्रा चा पाणीपट्टी दरासंबंधीचा जो आदेश अंमलात असेल त्याप्रमाणे पाणीपट्टीचे दर लागू होतील. म.ज.नि.प्रा चा उपरोक्त आदेश नसल्यास त्या दिवशी लागू असलेल्या शासन निर्णयानूसार पाणीपट्टीचे दर लागू होतील. म.ज.नि.प्रा.च्या पाणीपट्टी दरासंबंधीच्या आदेशात काही सुधारणा झाल्यास करारनाम्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या वर्षात पाणीपट्टीचे सुधारित दर लागू होतील.

## ५.० <u>भू-जल व पाण्याचा पुनर्वापर</u> :

५.१ म.सिं.प.शे.व्य. अधिनियम २००५ कलम २५(१) अन्वये पाणी वापर संस्थेला सिंचनासाठी स्वतःच्या खर्चाने पाण्याचा पुनर्वापर करण्याचे स्वातंत्र्य असेल. अशा प्रकारे पाण्याचा पुनर्वापर करण्यासाठी संस्थेला कोणताही जादा आकार ज.सं.वि.स द्यावा लागणार नाही.

५.२ म.सिं.प.शे.व्य. अधिनियम २००५ कलम २५(२) अन्वये पाणी वापर संस्थेला कालव्याच्या पाण्याबरोबरच किंवा अन्यथा त्यांच्या लाभक्षेत्रातील भूजलाचा विहित रीतीने वापर करण्याचे

स्वातंत्र्य असेल. भूजलाचा वापर केल्याबद्दल संस्थेला कोणताही जादा आकार ज.सं.वि.स द्यावा लागणार नाही.

## ६.० जल संपदा विभागाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :

६.१ ज.सं.वि. खालील कर्तव्ये पार पाडेल आणि त्याकरता जबाबदार असेल.

(१) करार करण्यात आल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत पाणी वापर संस्थेच्या पदाधिकाऱ्यां सोबत संस्थेच्या लाभक्षेत्रातील संपूर्ण कालवा व्यवस्थेची म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २२(१) अन्वये संयुक्त तपासणी करणे आणि कलम २२(२) मधील व्याख्येप्रमाणे प्राथम्य-१ व २ च्या सूच्यांप्रमाणे पुनर्स्थापनेची कामे निश्चित करणे.

(२) म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २२(३) अन्वये संयुक्त तपासणीच्या निष्कर्षांची पा.वा. संस्था व कालवा अधिकारी यांनी स्वाक्षरी केलेल्या दोन प्रतींमध्ये नोंद ठेवणे व एक प्रत संस्थेस देणे.

परंतू, संयुक्त तपासणीनंतर तयार केलेल्या प्राथम्य-१ व २ च्या सूच्या अंतिम असतील व त्यात पुढे बदल करता येणार नाहीत.

(३) म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २२(५) अन्वये संयुक्त तपासणीवर आधारित हाती घेण्यात यायच्या प्राथम्य-१ व २च्या कामांची यादी तयार करणे

(४) म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २२(५) अन्वये प्राथम्य-१ ची कामे संयुक्त तपासणीच्या तारखेपासून १२ महिन्यांच्या आत पूर्ण करणे आणि चाचणी घेतल्यानंतर पा.वा. संस्थेस ती हस्तांतरित करणे.

(५) म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २२(५) अन्वये वरील प्रमाणे हस्तांतरण झाल्यानंतर प्राथम्य-२ ची कामे जास्तीत जास्त अठरा महिन्यांच्या आत अथवा अपवादात्मक परिस्थितीत कालवा अधिकाऱ्याने वाढविलेल्या कालावधीत पूर्ण करणे.

(६) म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २३(१) अन्वये पाणीपुरवठ्याच्या जागी कालव्यावर योग्य रित्या प्रवाहमापन करणारे साधन किंवा साधने पुरवणे आणि ती योग्य प्रकारे काम करीत असल्यामुळे खात्री करणे

(७) हंगामाच्या सुरुवातीस पा.वा. संस्थेबरोबर संयुक्त बैठक आयोजित करणे, पाण्याच्या उपलब्धते संदर्भातील माहिती संस्थेस देणे, आवर्तन कार्यक्रम व कालवा कार्यचालन वेळापत्रक अंतिम क्रणे आणि जलव्यवस्थापनाशी संबंधीत अन्य आवश्यक माहिती संस्थेस पुरवणे.

(८) म.ज.नि.प्रा ने नियुक्त केलेल्या विनियमकाचे नाव उपरोक्त बैठकीमध्ये संस्थेस सांगणे.

(९) पाण्याचे हिशेब ठेवण्यासाठीचे विहित नमुने संस्थेस पुरवणे आणि ते भरण्यासाठी संस्थेस मार्गदर्शन करणे.

(१०) पाणी वापर संस्था अथवा विनियमकाने निदर्शनास आणलेल्या पाणी पुरवठ्यातील त्रुटी पुरवठ्याच्या जागी दुरुस्त करणे.

(११) पा.वा. संस्थेच्या प्रत्येक सदस्यास देय पाणी वापर हक्कांप्रमाणे संस्थेने मंजूर केलेला पाण्याचा वाटा मिळतो आहे ना याचे संनियंत्रण करणे व त्याबाबत कालवा अधिकाऱ्यामार्फत सुनिश्चिती करणे.

(१२) म.ज.नि.प्रा. च्या पाणीपट्टी दराच्या आदेशात विहित केल्याप्रमाणे आकारणी करुन दर हंगामाच्या अखेरीस पाणीपट्टीचे बिजक/देयक पा.वा. संस्थेस देणे व ते मुदतीत, लागू असल्यास दंडासह, वसूल करणे.

(१३) राज्य शासनाच्या आदेशाप्रमाणे / म.ज.नि.प्रा. च्या पाणीपट्टी दरा संदर्भातल्या आदेशाप्रमाणे करार करण्याच्या दिनांकास लागू असेल त्यानुसार आणि त्यात वेळोवेळी केलेल्या सुधारणांप्रमाणे पा.वा. संस्थेस देखभाल व दुरुस्ती निधी उपलब्ध करुन देणे.

(१४) देखभाल व दुरुस्ती निधीच्या पा.वा. संस्था करत असलेल्या विनियोगाचे संनियंत्रण म.ज.नि.प्रा. ने पाणीपट्टी दरा संदर्भातील आदेशात निश्चित केलेल्या कार्यपध्दतीने करणे आणि कालवा प्रणालीची देखभाल संस्थेमार्फत योग्य प्रकारे होत आहे याची संयुक्त तपासणीद्वारे सुनिश्चिती करणे.

(१५) प्रत्येक हंगामाच्या अखेरीस पा.वा. संस्थेच्या लाभक्षेत्रातील सिंचित क्षेत्र, पीक रचना, भूजल व पाण्याच्या पुनर्वापराद्वारे सिंचित झालेले क्षेत्र, इत्यादी माहिती संकलीत करणे; प्रत्येक सहस्त्र घनमीटर पाण्याने किती क्षेत्र सिंचित झाले हे दर्शवणारा संस्थेचा जललेखा अहवाल तयार करणे; जललेखा अहवाला आधारे संस्थेची प्रगती दर्शवणारा बेंच मार्किंग अहवाल दरवर्षी ज.सं.वि. ने तयार करणे.

(१६) कालवा प्रचालन व देखभाल-दुरुस्ती संदर्भात पा.वा. संस्थेस आवश्यक ते व आवश्यक तेव्हा तांत्रिक व व्यवस्थापकीय मार्गदर्शन करणे. कालवा प्रचालन, देखभाल व दुरुस्ती आणि पाणी वापर हक्क याबाबतीत तांत्रिक मार्गदर्शक तत्वे/तांत्रिक संहिता मराठीत प्रसृत करणे.

## ७.० पाणी वापर संस्थेची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :

७.१ खाली नमूद केलेल्या कर्तव्ये व जबाबदाऱ्यांच्या विशेष संदर्भात म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम ५२ प्रमाणे पाणी वापर संस्था कामे करेल व आपले अधिकार वापरेल.

(१) ज.सं.वि. कडून देय पाणी वापर हक्क प्राप्त झाल्यावर संचालक मंडळाची बैठक बोलावणे; पाणी वाटपा संदर्भात सदस्यांना माहिती देणे; सदस्यांना सिंचनाचे पास देण्याकरता त्यांच्याकडून पाणी अर्ज मागवणे;

(२) सदस्यांकडून मागणी प्राप्त होताच ती संकलित करणे; पाणी पाळ्यांची संख्या, प्रत्येक पाणी पाळीचा कालावधी, पाणी पाळीच्या तारखा, देय पाणी वापरहक्काच्या मर्यादेत प्रत्येक पाणीपाळीत लागणाऱ्या पाण्याचे घनफळ, इत्यादी बाबी निश्चित करणे आणि संयुक्त बैठकीपूर्वी ही सर्व माहिती ज.सं.वि.स कळवणे.

(३) ज्यांना मंजुर पाणी पास दिले आहेत अशा सदस्यांना त्यांच्या मागणीनुसार चारीच्या "शेपटाकडून मुखाकडे" (टेल टू हेड) अशा क्रमानेच काटेकोरपणे पाणी पुरवणे.

(४) संस्थेच्या सर्वसाधारण सभेने मान्यता दिलेल्या पाणीपट्टीच्या दरांप्रमाणे सदस्यांना पाणीपट्टी आकारणे.

(५) संस्थेच्या सर्वसाधारण सभेने ठरविलेल्या पध्दतीने सदस्यांकडून मागील थकबाकी वसूल करणे.

(६) पाणी वापर संस्थेला हस्तांतरित केलेल्या कालवा प्रणालीची देखभाल दुरुस्ती करणे; कालवा प्रणालीच्या सूयोग्य देखभालीकरता देखभाल-दुरुस्तीच्या निधीचा विनियोग करणे आणि विहित नमुन्यात निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र ज.सं.वि.स देणे.

(७) शेतचाऱ्या व शेतचर चांगल्या अवस्थेत राहण्यासाठी सदस्य त्यांची देखभाल करतील याची सुनिश्चिती करणे.

(८) सुक्ष्म-सिंचनाचा सदस्यांनी अवलंब करुन पाण्याची बचत करावी याकरता त्यांना प्रोत्साहन देणे.

(९) पाण्याचे हिशेब विहित नमुन्यात ठेवणे आणि पाणी पातळी नोंदीतील तफावत ज.सं.वि. कडून त्वरीत दुरुस्त करुन घेणे.

(१०) पाणीपट्टीच्या बिजकाप्रमाणे/देयकाप्रमाणे विहित मुदतीच्या आत ज.सं.वि. कडे पाणीपट्टी भरणे.

(११) लेखा-पुस्तके आणि अन्य अभिलेख अद्ययावत ठेवणे; लेखा परीक्षकाकडून लेखा परीक्षण करुन घेणे; दरवर्षी ३० सप्टेंबर पूर्वी (म.सिं.प.शे.व्य नियम, २००६ - नियम क्र. ३८) लेखा-अहवाल ज.सं.वि. स सादर करणे आणि सदस्य व ज.सं.वि.यांचे साठी माहिती खुली करण्याच्या हेतूने वार्षिक अहवाल प्रकाशित करणे.

## ८.० **वाद निवारण :**

८.१ करारामध्ये समाविष्ट असलेल्या कोणत्याही बाबतीत, पाणी वापर संस्था आणि कालवा अधिकारी यांच्यात कोणताही विवाद उद्‌भवल्यास, त्यावर संबंधीत अधीक्षक अभियंता म.सिं.प.शे.व्य. अधिनियमाच्या कलम २२(७) अन्वये निर्णय देतील व त्यांचा त्या प्रकरणातील निर्णय अंतिम असेल.

८.२ पाणी वापर संस्थेच्या सदस्यांमध्ये तिची रचना, व्यवस्थापन, अधिकार आणि कार्ये यांच्या संबंधीत कोणताही विवाद किंवा मतभेद उद्‌भवल्यास, तो संबंधीत पाणी वापर संस्थेच्या व्यवस्थापन समितीकडून सोडवला जाईल.

८.३ पाणी वापर संस्थेचा सदस्य आणि तिची व्यवस्थापन समिती यांच्यामध्ये कोणताही विवाद किंवा मतभेद उद्‌भवल्यास, उच्चस्तरीय संस्था गठीत होईपर्यन्त कालवा अधिकारी यांच्याकडून विवाद सोडवला जाईल.

८.४ देय पाणी वापर हक्काच्या मर्यादेत पा.वा. संस्थेने केलेल्या मागणीनुसार ज.सं.वि. ने घनमापन पध्दतीने पाणी पुरवठा करण्याबाबत म्हणजे पाणी वापर हक्क जाहीर करणे व देणे याबाबतचा कोणताही विवाद किंवा मतभेद कालवा अधिकारी किंवा उच्चस्तरीय संस्था यांनी न सोडविल्यास ते प्रकरण म.ज.नि.प्रा. अधिनियमाच्या कलम २२(१) अन्वये प्राथमिक विवाद निवारण अधिकाऱ्यापुढे उपस्थित करता येईल. प्रस्तुत करारासंदर्भात-------------------------- हे निर्देशित प्राथमिक विवाद निवारण अधिकारी आहेत.

८.५ प्राथमिक विवाद निवारण अधिकारी, विवादावर सुनावणी करतेवेळी, विहित करण्यात येईल अशी कार्यपध्दती अनुसरील.

८.६ प्राथमिक विवाद निवारण अधिकाऱ्याच्या आदेशाने पाणी वापर संस्था व्यथित झाल्यास, असा आदेश मिळाल्याच्या दिनांकापासून साठ दिवसांच्या आत पा.वा. संस्थेला म.ज.नि.प्रा अधिनियमाच्या कलम २२(२), २२(३) व २२(४) अन्वये म.ज.नि.प्राकडे अपील दाखल करता येईल.

## ९.० <u>शास्ती व नुकसान भरपाई</u> :

९.१ पा.वा. संस्थेने पाणीपट्टी न भरल्यास शास्तीच्या विहित तरतुदी अंमलात आणण्याचा अधिकार ज.सं.वि.स असेल.

९.२ देय पाणी वापर हक्काप्रमाणे मागणी केलेल्या व संस्थेने न वापरलेल्या पाण्यावर, म.ज.नि.प्रा. ने निश्चित केल्याप्रमाणे, किमान आकार बसविण्याचा अधिकार ज.सं.वि.स असेल. परंतु, देय पाणी वापर हक्काप्रमाणे पाणी उपलब्ध करुन दिले गेले नसल्यास तसा किमान आकार लावला जाणार नाही.

९.३ देय पाणी वापर हक्काप्रमाणे ज.सं.वि. पाणी उपलब्ध करुन देऊ शकला नाही तर महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ मधील कलम ७८ अन्वये नुकसान भरपाईचा निर्णय घेण्यात येईल.

९.४ सदस्यांनी पाण्याची मागणी न केल्यास किंवा पाणी अर्ज मंजुर करुन सिंचन-पास दिल्यावरही सदस्यांनी पाणी वापर न केल्यास आपल्या सदस्यांकडून किमान आकार वसूल करण्याचा अधिकार संस्थेस असेल. परंतु, मंजुरी प्रमाणे सदस्यास पाणी पुरवठा झाला नसल्यास तसा किमान आकार लावला जाणार नाही.

९.५ पा.वा. संस्था स्थापन झाल्यानंतरची पाणीपट्टीतील थकबाकी सदस्यांनी न दिल्यास त्यांचा पाणी पुरवठा थांबविण्याचा अधिकार संस्थेस असेल.

## १०.० <u>पुनर्विलोकन</u> :

१०.१ शासनाच्या पूर्व परवानगीने आणि करारनाम्यातील दोन्ही पक्षकारांच्या सहमतीने करारनाम्यात बदल करता येतील.

## ११.० <u>संकीर्ण</u> :

११.१ या करारनाम्यात ज्या मुद्यांचा व व्याख्यांचा समावेश केलेला नाही अथवा या करारनाम्यातील कोणत्याही कलमात काही त्रुटी असल्यास म.ज.नि.प्रा. अधिनियम-२००५ व म.सिं.प.शे.व्य अधिनियम-२००५ मधील संबंधीत तरतुदींचा आणि म.पा. अधिनियम-१९७६ मधील लागू असलेल्या तरतुदींचा संदर्भ घेतला जाईल.

## १२.० <u>परिशिष्टे</u> :

१२.१ या करारनाम्यास खालील परिशिष्टे जोडण्यात आली आहेत.

(१) महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात प्रकाशित केलेल्या अधिसूचना क्र. १, २ व ३ च्या प्रती.
(२) संस्थेच्या कार्यक्षेत्राच्या अद्ययावत नकाशाची प्रमाणित प्रत.
(३) लघुवितरिकास्तरीय पा. वा. संस्थेच्या सदस्यांच्या अद्ययावत यादीची प्रमाणित प्रत.
(४) प्रवाह मापकाचा नकाशा (लंबछेद, काटछेद व प्रवाहमापकाचे ठिकाण दर्शविणारी साखळी) आणि प्रवाह-तक्ता.
(५) पा. वा. संस्थेस हस्तांतरित केलेल्या मत्तांची यादी.
(६) कंत्राट व्यवस्थापन समिती संदर्भातील शासन निर्णयाची व कंत्राट व्यवस्थापन समिती स्थापन करण्याकरता काढलेल्या आदेशाची प्रत.

१२.२ पा.वा. संस्थेने मागणी केल्यास देता येतील अशी विभाग कार्यालयात उपलब्ध असलेली परिशिष्टे.

(१) प्रकल्पाचा दर्शक नकाशा
(२) लघुंवितरिकेची महत्वाची वैशिष्ठे
(३) लघुवितरिकेवरील सर्व बांधकामांची नावे व साखळीक्रमांक
(४) लघुवितरिकेचा लंबछेद व काटछेद
(५) लघुवितरिकेचे संकल्पन दर्शवणारे विवरणपत्र
(६) लघुवितरिकेकरता संपादित केलेल्या जमीनीच्या सीमारेषा व तत्सम तपशील दर्शवणारा गाव-नकाशा

करारनाम्यातील सर्व अटी व कागदपत्रे आम्ही वाचली आहेत. पूर्ण अभ्यासाअंती करारनाम्यातील सर्व अटी आम्हाला मान्य आहेत म्हणून संयुक्त करारनाम्यावर आम्ही सह्या करत आहोत.

**अध्यक्ष**
-------------------------------
लघुवितरिकास्तरिय पा.वा. संस्था
मु.पो. ------------
तालुका --------------
जिल्हा ---------------

**कार्यकारी अभियंता**
---------------पाटबंधारे विभाग
मु.पो. ------------
तालुका --------------
जिल्हा ---------------

# AGREEMENT

## 1. Parties to the Agreement

1.1 In accordance with the provisions under Sections 21 and 29 of the Maharashtra Management of Irrigation Systems by Farmers (MMISF) Act, 2005 (hereinafter referred to as the Act) the following agreement is hereby executed between the Executive Engineer,________________Division on behalf of the Hon'ble Governor of Maharashtra, hereinafter called the Water Resources Department (WRD) and the Chairperson, ____________________ Water User Association (formed under the Act and MMISF Rules, 2006 with registration No ._____________ and notified vide Notification No. III on the Maharashtra Government Gazette dated ____________________.)

1.2 In this agreement, Water Resources Department includes River Basin Agencies (RBA) and Canal Officer means Executive Engineer or his authorized representative.

## 2. Objective of the Agreement

2.1 To hand over irrigation management of _________ ha delineated CCA to the WUA for irrigation management under __________ Minor No. ______________ distributary No. of ___________ main canal of _______________ irrigation project in _____________ sub-basin of _______________basin in ______________ taluka of _______________ district.

2.2 The ownership of the above system handed over to the WUA for the purposes of management shall continue to vest in the State Government as per Section 69 of the Act.

2.3 With the handing over of the said irrigation system to the WUA, it is expected that not only the distribution of water will be done equitably but also water use efficiency and crop productivity will improve.

2.4 The agreement covers the duties and responsibilities of the WRD in regard to timely supply of water on volumetric basis to the WUA at the minor head as per Applicable Water Entitlement, making available required maintenance grants to the WUA and imparting training and providing technical assistance to the WUA and duties and responsibilities of the WUA in regard to distribution of water to its Members as per their share, utilisation of grants for proper maintenance and repair of the system handed over to the WUA, recovery of water charges from the Members and proper upkeep of records pertaining to water management and accounts of the WUA.

## 3. Water Use Entitlement

3.1 The sanctioned water use Entitlement of the Association for________ha delineated CCA, as determined by MWRRA for a normal (design) year, for rabi & hot weather is ________thousand cubic metres (TCM).

3.2 The Applicable Water Entitlement and Prescribed Unit Water Use Entitlement in TCM and $m^3$ (cm. depth) respectively, separately for rabi (15th October to 28th February) and hot weather (1st March/ 31st March to

30th June) will be determined by WRD based on storage portion in the reservoir on 15th October of each year.

3.3 The Sanctioned Water Use Entitlement is subject to review after three years in terms of Section 11(j) of the MWRRA Act.

3.4 There shall be no Entitlement prescribed for the Kharif period (1st July to 14th October). Kharif supply will be for protective irrigation of 1 – 2 waterings and restricted to 20% of storage or utilisation as planned in the design of the project.

3.5 The WUA may utilise that part of the unutilised Entitlement of 'rabi' in the 'hot weather'. WRD will reassess the Applicable Water Entitlement for the hot weather season and inform the WUA, duly accounting for evaporation and transmission losses.

3.6 The WUA shall have the freedom of growing different crops within the Applicable Water Entitlement subject to_____________(restriction, if any, to be mentioned).

## 4. <u>Water Rates</u>

4.1 The volumetric rate for supply of water in each season measured at the point of supply will be as determined by MWRRA in its tariff order applicable on the date of the agreement or in the absence of such an order by the relevant GR of the State Government applicable on the date of agreement. The tariff for the second and third years of the agreement will be as per revisions, if any, in the relevant tariff order.

**5. Ground Water & Recycled Water**

5.1 As per Section 25(1) of the MMISF Act 2005, the WUA shall have the freedom of recycling the water, at its own cost, for irrigation and there shall not be any extra charge to be paid to the WRD for such recycling.

5.2 As per Section 25(2) of the MMISF Act 2005, the WUA shall have the freedom of using ground water in their command area, in the prescribed manner, in conjunction with canal water or otherwise and there shall not be any extra charge to be paid to the WRD for use of such ground water.

**6. Duties & Responsibilities of the WRD**

6.1 The WRD shall perform the following duties and shall be responsible for the following.

(i) as per Section 22(1) of the MMISF Act 2005, to jointly inspect with the office bearers of the WUA, within a period of three months from the date of Agreement, the entire canal system within the command area of the WUA and identify the rehabilitation works required to be carried on as Priority I & Priority II, as defined in Section 22(2) of the MMISF Act.

(ii) to record the findings of the joint inspection in duplicate and to give one copy to the WUA, duly signed by both parties as per Section 22(3) of the MMISF Act.

Provided that the lists so prepared after joint inspection will be final and not **amendable** to further changes.

(iii) to prepare, based on the joint inspection, a list of items of work to be undertaken as Priority I & Priority II, as per Section 22(5) of the Act.

(iv) to complete the Priority I works within a period of twelve months from the date of joint inspection and hand over the system to WUA after testing as per Section 22(5) of the Act.

(v) to complete thereafter the Priority II works within a period of eighteen months from the date of handing over of the system, or as extended in exceptional cases by the Canal Officer, as per Section 22(5) of the Act.

(vi) to provide a proper measuring device or devices on the canal at the point of supply to the WUA and ensure its proper working as per Section 23(1) of the Act,

(vii) to conduct a joint meeting with the WUA at the beginning of the season and provide information to the WUA on availability of water, **finalize** the rotation programme and canal operation schedule and pass on any other relevant information pertaining to water management.

(viii) to inform the WUA in the meeting the name of the Regulator appointed by the MWRRA.

(ix) to supply the prescribed forms for maintenance of water account to the WUA and provide guidance to the WUA for filling the forms.

(x) to rectify any deficiencies in water supply at the point of supply as may be brought to its notice by WUA or the Regulator.

(xi) to monitor and ensure through the Canal Officer that every member of the WUA receives the quantum of water as sanctioned to him by WUA out of the Applicable Entitlement.

(xii) to issue at the end of the season, after assessment, the bill for water supplied to the WUA and recover the same within the time limit and with penalties, as may be due, as prescribed in the MWRRA tariff order.

(xiii) to make available maintenance grants to the WUA as due to them as per State Government Order / MWRRA Tariff Order in force on the date of the agreement and amended from time to time.

(xiv) to monitor the utilisation of the maintenance grants by WUA as per procedure laid down in MWRRA's tariff order and ensure through joint inspection that the system is properly maintained by the WUA.

(xv) to compile information at the end of every season on irrigation area, cropping pattern, area irrigated by ground water and by recycling in the command area of the WUA and prepare a water audit report for the season indicating the area irrigated per 1000 cubic metres. Based on the water audit reports, WRD to bring every year a Bench Marking report on performance of WUA.

(xvi) to provide necessary technical and managerial assistance to the WUA **operation and maintenance, water distribution and technical guidance as and when required.** Issue technical guidelines / manuals **on operation and maintenance and water entitlement** in Marathi.

## 7. Duties and Responsibilities of the WUA

7.1 The WUA shall perform the functions and exercise powers enumerated in Section 52 of the Act with special reference to the following.

(i) to convene a meeting of the Managing Committee on receipt of Applicable Water Entitlement from WRD, inform members about their allocation and invite application for irrigation passes from them.

(ii) on receipt of demand from members, consolidate the demand and assess the number of rotations, duration of each rotation, dates of rotation, quantity per rotation within the limits of the Applicable Entitlement and inform WRD the same **before Joint Meeting**.

(iii) to supply water to the members who are sanctioned irrigation passes as per their demand strictly from tail to head.

(iv) to charge its members water rates as may be approved by the General Body of the Association.

(v) to recover previous dues from members in a manner decided by the General Body.

(vi) **To maintain canal system handed over to WUA and** to utilise the maintenance grants for proper maintenance of the system and submit utilisation certificates to the WRD in prescribed proforma.

(vii) **To ensure that members maintain field channels and field drains in good condition.**

(viii) to promote water conservation among members through adoption of micro irrigation.

(ix) to maintain the water account in prescribed proformae and get any discrepancy in gauge readings, etc. corrected immediately with WRD.

(x) to remit water charges payable to WRD within the prescribed period against bills received.

(xi) to maintain the book of accounts and other records properly and **get audited by auditor and submit audit report to WRD before 30th September (Rule 38 MMSIF Rules 2006). Publish Annual Report to make open** information of the members and the WRD.

**8. Dispute Resolution**

8.1 If any dispute arises between the WUA and Canal Officer regarding anything contained in the Agreement the same shall be resolved by the concerned Superintending Engineer and his decision in the matter shall be final, as per Section 22(7) of the Act.

8.2 Any dispute or difference concerning the constitution, management, powers or functions of the WUA amongst members shall be resolved by the Managing Committee of the Association.

8.3 Any dispute or difference arising between a member and the Managing Committee of the WUA shall be resolved by the Canal Officer till the Upper Level Association is formed.

8.4 Any dispute of difference **not resolved by canal officer or upper level** relating to volumetric supply by WRD as per demand of WUA from out of the Applicable Entitlement i.e. relating to issuance and delivery of Entitlement between WRD & WUA shall be referred to the Primary Dispute Resolution Officer in terms of Section 22(1) of the MWRRA Act. For

purposes of this agreement (name and designation of the PDRO) is the designated PDRO.

8.5 The PDRO shall follow such procedure as may be prescribed while hearing the dispute.

8.6 If the WUA is aggrieved with the order of the PDRO, it can, within sixty days from the date of receipt of such order, prefer an appeal to the MWRRA in terms of Section 22(2), 22(3) & 22(4) of the MWRRA Act.

**9. Penalty & compensation**

**9.1 The WRD has the right to enforce the prescribed penal provisions for non-payment of tariff by the WUA.**

**9.2 The WRD may levy a minimum charge as determined by the MWRRA for water demanded and not used by the Association in a season as per Applicable Water Entitlement.**

**Provided that no such minimum charge shall be levied if water is not made available as per the Applicable Entitlement.**

**9.3 If WRD could not make available water as per applicable entitlement, the decision regarding compensation shall be taken in accordance with provision of section 78 of Maharashtra Irrigation Act 1976.**

**9.4 The WUA may to levy a minimum charge from a member for water not demanded by and not used him after sanction and issue of irrigation pass.**

**Provided that no such minimum charge shall be levied if water as sanctioned is not supplied to the member.**

**9.5 The WUA may to stop supply of water to those members who do not pay the previous dues since formation of WUA.**

**10. Revision**

**10.1 Agreement can be modified with mutual consent of the parties to agreement with prior approval of Government.**

**11. Miscellaneous**

11.1 Issue and definitions not covered in this agreement or in case of any discrepancy in any provision / clause of this agreement, the relevant provisions in the MWRRA Act, 2005, MMISF Act, 2005 and applicable provisions of the M.I. Act, 1976, shall refer.

**12. Annexes**

12.1 Following are annexed to this agreement.

a) Copies of Notification No. 1,2 & 3 published in Maharashtra Government Gazette.

b) Certified copy of Updated Map showing area of operation of WUA.

c) Certified copy of Updated List of members of minor level WUA.

d) Map of Measuring Device (Map showing L-section, Cross section & chainage at Measuring Device location) and calibration chart.

e) List of Assets transferred to WUA.

f) G.R. of CMC Formation & copy of Order of CMC Formation.

12.2 Annexes available in Division Office which can be given to WUA on demand :

a) Index Map of project.

b) Salient Features of minor.

c) Name & chainage of all structures on minor.

d) L-section & cross section of minor.

e) Statement of design of minor.

f) Village map showing details and boundary of land acquired for minor by Water Resources Department.

We have read all the conditions **and documents as mentioned** in the agreement. After complete study, we agree with all the conditions in the agreement. Hence joint agreement is signed.

Chairman

Minor Level Association. At post_____Taluka_____

Executive Engineer

______Irrigation Division

At post______Taluka____ At District__________